कथा चतुर्थीच्या एक चिंतन

कोणतेही व्रत म्हटले की त्या व्रतार्थ प्रेरणा देणे हे शास्त्रग्रंथांचे एक प्रधान कार्य असते. याच कारणाने श्रीमुदगल पुराणाचा चतुर्थ खंड चतुर्थी व्रत कथांसाठी जणू समर्पित आहे.
१२ महिन्यात येणाऱ्या २४ चतुर्थी आणि अधिक मासातील २ अशा २६ चातुर्थींच्या ५२ कथा श्रीमुदगल पुराणात वर्णित आहे.

गाणपत्य संप्रदायात दोन्ही चतुर्थींना समान महत्व दिले आहे. शुध्द पक्षात अर्थात अमावस्ये नंतर येणा-या चतुर्थीस विनायकी चतुर्थी असे म्हणतात. तर वद्य पक्षात अर्थात पोर्णिमे नंतर येणा-या चतुर्थीस संकष्टी चतुर्थी म्हणतात. विनायकी चतुर्थीचे व्रत अष्ट प्रहरात्मक अर्थात पूर्ण दिवसाचे असते. संपूर्ण दिवस उपवास करून पंचमीसच पारणे केले जाते. तर संकष्टी चतुर्थीचे व्रत हे सकामोपासकांसाठी पंचप्रहरात्मक वर्णिले आहे. अर्थात चंद्रोदयानंतर श्रीगणेशपूजन आरती इ. करून भोजन घेण्याचा प्रघात आहे. मात्र निर्गुणोपासकांसाठी हे व्रतही पूर्ण दिवस करण्याची संप्रदायिक रीती आहे.

दोन्ही चतुर्थींना मंगळवार आल्यास अधिक महत्व दिले जाते. विनायकी चतुर्थी मंगळवारी आल्यास त्यास अंगारक योग म्हणतात तर संकष्टी मंगळवारी आल्यास तिला अंगारकी चतुर्थी म्हणतात. विनायकीची प्रधानपूजा मध्यान्ह काळी तर संकष्टीची प्रधानपूजा चंद्रोदय समयी करतात.

गाणपत्य संप्रदायात आचमन ते विसर्जन केवळ श्रीगणेशपर मंत्रांचाच उपयोग करून पूजन करण्याची रीती आहे. (त्या करीता पहा संजना प्रकाशन मुंबई प्रकाशित पुस्तक श्रीगणेशोपासनेचा ओनामा) या दोन्ही चतुर्थींना श्रीगणेशपूजनानंतर श्रीगणेश तथा देवी चतुर्थीला अर्घ्य द्यावेत. प्रथम चतुर्थीला अर्घ्य द्यावा. त्या करीता-

तिथींना मातृरुपे त्वं देवि सर्वार्थदायिनी!
ग्रहाणार्घ्यं मया दत्तं चतुर्थिते नमो नम:!

या मंत्राचा उच्चार करून तीन अर्घ्य द्यावेत. त्यानंतर-

गजानन नमस्तुभ्यं नाना सिद्धी प्रदायिने!
बुद्धीयते ग्रहांनार्घ्यं मया दत्तं शुभप्रदम!

या मंत्राने श्रीगणेशानां तीन अर्घ्य द्यावेत.
संकष्टी चतुर्थीला या दोघांच्यानंतर-

अत्रिगोत्र समुदभूतं गणेशपितीवर्धनम!
ग्रहाणार्घ्यं मया दत्तं रोहिण्यामृतधारक!

या मंत्राने श्रीचंद्राला सात अर्घ्य द्यावेत.

अशा रीतीने चतुर्थी व्रत करणे श्रीगणेशांना अतीव प्रिय आहे. अशा या व्रताचरनार्थ प्रेरित करण्यासाठी श्रीमुदगल पुराणाने अनेक कथा वर्णिल्या.
पुराणांच्या या कथा दोन प्रकारच्या असतात.

एका प्रकारास म्हणतात विधीकथा तर दुसरा प्रकार म्हणजे निषेध कथा.
विधीकथा म्हणजे यांनी यांनी हे व्रत केले. त्यांना हे हे लाभ झाले. अत: तुम्हालाही हे लाभ हवे असतील तर तुम्हीही हे व्रत करा अशी प्रेरणा देणा-या कथा.

तर दुसरा प्रकार म्हणजे निषेध कथा. अर्थात यांनी यांनी या व्रताचे पालन केले नाही ही म्हणून त्यांना ही दु:खे भोगावी लागली. जर तुम्हाला ही दु:खे नको असतील तर व्रत करा. अशी "भीतीपोटी जीती" सांगणा-या कथा म्हणजे निषेध कथा. दोन्हींचा उद्देश एकच असतो प्रीतीने असो की भीतीने असो माणसाला व्रताचारी बनविणे.

या व्रताचरणाकरीता व्रतमाहात्म्यास अनेकदा अतिशयोक्ती पूर्ण रीतीने वर्णिले जाते. उदा. "एका गावात एक महापापी दरोडेखोर होता किंवा एक वेश्या होती. तृतीयेस त्याने इतके मद्यपान केले की त्याची वा तिची सगळी चतुर्थी त्या बेशुद्धीतच गेली. पंचमीस सकाळी त्यास साप चावला व तो मेला आणि

थेट स्वानंद लोकास गेला" अशा कल्पनातीत कथा श्रीमुदगलात सापडतील.

आता प्रश्न आहे की खरेच मुक्ती इतकी सोपी आहे कां? तर मुळीच नाही. मग अशी कथा कां सांगितली तर त्याचा कथनीय उद्देश समजून घ्यायला हवा. जर इतका पापी व्यक्तीही अजाणता घडलेल्या व्रताने उद्धरून जातो तर माझ्या समान सदवर्तनी व्यक्तीस जाणीवपूर्वक व्रत केल्यावर इप्सित फल प्राप्ती निश्चित होणारच हा विश्वास निर्माण करणे इतकेच या कथेचे सार असते. अन्य सर्व कथाही अशाच अंगांनी "समजून" घेतल्या तर मग त्या विचित्र भाकडकथा न वाटता प्रेरणादायी उपाय वाटतील की जी त्या कथांचा खरा उद्देश आहे.

जलोदरापासून महारोगापर्यंतचे सगळे रोग, दुष्काळापासून अतिवृष्टीपर्यंतची संकटे आणि निपुत्रीकतेपासून राज्यहानी पर्यंतची सगळी दु:खे दूर करण्याचा एकमात्र उपाय म्हणजे जणू चतुर्थी. अशा स्वरुपात या कथा पहावयास मिळतात. कोणत्याही उपरोक्त दु:खग्रस्ताला त्या त्या अध्यायात भेटलेले श्रीगुरू चतुर्थीच सांगतात.

अशा कथनाचे अनेक हेतू आहेत ते आम्ही शांतपणे समजून घेतले पाहिजे एक तर सगळ्याच ऋषीमुनीनी एकमुखाने चतुर्थी महात्म्य सांगणे हे त्याच्या सर्वमान्यतेचा गौरव करणे आहे. इतकी वेगवेगळी दु:खे वर्णिली आहेत की त्या मानाने आपल्या जीवनातील दु:खे काहीच नाहीत. इतकी दु:खे पहिली की एक तर आपणास तसेच हलके वाटते की आपण "बरे" आहोत. आणि मग विश्वास निर्माण होतो की ही दु:खेही गेली तर माझे तर जाणारच या विश्वासाने व्रताचरण केले की मिळणारा मानसिक आधार व्रताचे खरे उपयोगित्व आहे.

अर्थात सगळ्यात महत्वाचे प्रयोजन एकच श्रीगणेशकृपा. ती झाली की मग काय असंभव?

"किं दुर्लभं विघ्नहरे प्रसन्ने"

अर्थात श्रीविघ्नराज प्रसन्न झाल्यावर दुर्लभ ते काय असणार? त्या करीता त्यांनाच प्रार्थना म्हणजे चतुर्थी!

!! जय गणेश !!